**शासकीय इमारतीत केवळ स्टार लेबल असलेल्या व ऊर्जा कार्यक्षम विद्युत/ऊर्जा उपकरणांचा वापर बंधनकारक करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

शासन परिपत्रक क्रं.अपाऊ-२००९/प्र.क्र.१०/ऊर्जा-७
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
मंत्रालय, मुंबई-३२
**दि. २१ जानेवारी,२०१०.**

संदर्भ :- १) शासन परिपत्रक क्र.उ.ऊ. व का. विभाग क्र.इसीए-२००५/प्र.क्र.३७/ऊर्जा-१, दि.२३.१.२००५.
२) शासन परिपत्रक सा.बा.वि. क्र संकीर्ण-२००५/११४/बिल्डिंग-३, दि.२३.३.२००६.

**प्रस्तावना:-**

विजेच्या/ ऊर्जेच्या वाढत जाणाऱ्या मागणीमुळे दिवसेंदिवस पुरवठा व मागणी यातील दरी वाढतच आहे. यासाठी उपलब्ध ऊर्जेचा अधिक कार्यक्षमतेने वापर करणे अत्यावश्यक झाले आहे. आपल्या देशात जीडीपीच्या युनिट वाढीसाठी होणारा ऊर्जेचा वापर हा जपानच्या तुलनेत ३.७ पट अधिक व अमेरिकेच्या १.५५ पट तर आशियाच्या १.४७ पट अधिक आहे. यावरुन आपल्या देशात ऊर्जा बचतीस असलेला वाव लक्षात येतो. यामुळे आपण आपल्या धोरणांची आखणी करताना देखील ऊर्जा कार्यक्षमतेचा विचार करणे आवश्यक झाले आहे. १ युनिट वीजेची बचत केल्यास २.५ युनिटची निर्मिती केल्यासारखे आहे.

देशभरामध्ये ऊर्जा बचतीचा कार्यक्रम मोठया प्रमाणावर राबविण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने ऊर्जा संवर्धन कायदा, २००१ पारित केला आहे. सदर कायदयानुसार ब्यूरो ऑफ एनर्जी एफिशियंसी (बी.इ.इ.) या संस्थेची स्थापना करण्यात आली. या कायदयाची राज्यामध्ये अंमलबजावणी करण्यासाठी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण या पदनिर्देशित संस्थेची (Designated Agency) नियुक्ती करण्यात आली आहे. राज्य शासनाने ऊर्जा संवर्धनाचे महत्व ओळखून शासकीय इमारतीत २० टक्के ऊर्जा बचतीचे उद्दिष्ट उपरोक्त संदर्भांकित दिनांक २३.१.२००५ च्या शासन परिपत्रकान्वये ठरवून दिले आहे. शासकीय / निमशासकीय इमारतीत ऊर्जा संवर्धन कार्यक्रम राबविल्यास त्याचा फायदा शासनास होऊन एक उत्तम उदाहरण म्हणून जनतेसमोर येईल. सध्या बाजारात नवीन तंत्रज्ञानावर आधारित ऊर्जा कार्यक्षम विद्युत उपकरणे उपलब्ध आहेत. अशा उपकरणांच्या वापरामुळे जुन्या तंत्रज्ञानावर आधारित उपकरणांच्या तुलनेत ३० टक्के वीजेची बचत होऊ शकते.

ब्युरो ऑफ एनर्जी एफिशियंसी, भारत सरकार यांच्याकडून स्टँडर्डस व लेबलिंग कार्यक्रमांतर्गत वीज उपकरणांच्या कार्यक्षमतेनुसार १ ते ५ स्टार लेबल देऊन त्यांचे मानांकन केले जाते. सदर उपकरणांची किंमत काही प्रमाणात जास्त असली तरी ही किंमत एकदाच दयावी लागते. मात्र, त्यापासून होणारी ऊर्जा बचत कायम स्वरूपी असल्यामुळे ही तूट लवकरच भरून निघते. राज्य शासनाने वाचवलेल्या विजेचा इतरत्र सुयोग्य वापर होऊ शकतो. ऊर्जा बचत करणा-या उपकरणांचे महत्व ओळखून संदर्भांकित शासन परिपत्रकाद्वारे शासकीय/ निमशासकीय/ स्थानिक स्वराज्य संस्था/महामंडळे यात सी.एफ.एल., टी-५ टयुब लाईट, टी-८ टयुब लाईट,

इलेक्ट्रॉनिक बलास्ट (चोक), इलेक्ट्रॉनिक फॅन रेग्युलेटर ही उपकरणे वापरण्याबाबत सूचना दिल्या आहेत. तथापि, याची अंमलबजावणी काटेकोरपणे होत नसल्याचे आढळून आले आहे.

वरील सर्व बाबी लक्षात घेता, शासकीय इमारतीत स्टार लेबल असलेली विद्युत/ऊर्जा उपकरणे वापरणे बंधनकारक करण्याच्या दृष्टीने खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. सर्व शासकीय/निमशासकीय/ स्थानिक स्वराज्य संस्था/ महामंडळे/शासन अंगीकृत उपक्रम/शासन अनुदानित संस्था/ निमशासकीय उद्योग यामध्ये सी.एफ.एल., टी-५ टयुब लाईट, टी-८ टयुब लाईट, इलेक्ट्रॉनिक बलास्ट (चोक), इलेक्ट्रॉनिक फॅन रेग्युलेटर ही उपकरणे वापरण्याचा शासनाने पुनरूच्चार केलेला असून त्याचा वापर बंधनकारक करण्यात येत आहे.

२. अ. सर्व शासकीय/निमशासकीय/ स्थानिक स्वराज्य संस्था/ महामंडळे/शासन अंगीकृत उपक्रम/शासन अनुदानित संस्था/ निमशासकीय उद्योग यामध्ये ब्युरो ऑफ एनर्जी एफिशिअन्सी यांनी लेबलिंग केलेली ४ स्टार व ५ स्टार लेबल असलेली विद्युत उपकरणे/ ऊर्जा उपकरणे वापरणे बंधनकारक करण्यात येत आहे.

ब. सदर ४ स्टार व ५ स्टार लेबल असलेली उपकरणे उपलब्ध नसल्यास ३ स्टार उपकरणांची खरेदी करण्याची मुभा देण्यात येत आहे.

३. बी.इ.इ., भारत सरकार यांनी त्यांचे www.bee-india.nic या वेबसाईटवर स्टॅंडर्ड अँड लेबलिंग कार्यक्रमांतर्गत विविध उपकरणांच्या स्टार लेबलिंग (मानांकन) विषयी महिती दिली आहे. या कार्यक्रमांतर्गत जास्तीत जास्त उपकरणांचे स्टार लेबलिंग करण्याचा केंद्र सरकारचा मानस आहे. सध्या फ्लोरोसंट टयुब लाईट रॉड, छत पंखे, वातानुकूलन यंत्रे (विंडो व स्प्लीट), रेफ्रिजरेटर (फ्रॉस्ट फ्री व डायरेक्ट कूल), २०० के.व्ही.ए. पर्यंतचे डिस्ट्रीब्युशन ट्रान्सफॉर्मर, १५ कि.वॅट पर्यंतचे पाण्याचे पंप (सबमर्सिबल व मोनोब्लॉक), गॅस स्टोव्ह, इलेक्ट्रिक गिझर, इंडक्शन मोटर्स, रंगीत टी.व्ही., अशा ११ प्रकारच्या उपकरणांना स्टार लेबलिंग उपलब्ध आहे. मात्र, भविष्यात या व्यतिरिक्त देखील इतर उपकरणे सदर कार्यक्रमांतर्गत समाविष्ट होणार आहेत. उदा.वाहने, डिझेल जनरेटर इ.

वर नमूद केल्यानुसार सर्व शासकीय/निमशासकीय/ स्थानिक स्वराज्य संस्था/ महामंडळे/शासन अंगीकृत उपक्रम/शासन अनुदानित संस्था/ निमशासकीय उद्योग यांनी सदर उपकरणे खरेदी करणे बंधनकारक करण्यात येत आहे. तसेच बी.इ.इ., भारत सरकार यांचे वेबसाईटवरील स्टार लेबल उपकरणे असलेली यादी जसजशी अद्ययावत होईल तसतशी नोंद घेऊन त्याप्रमाणे नव्याने समाविष्ट होणाऱ्या उपकरणांच्या खरेदीची कार्यवाही करावी. सदर वेबसाईटवर स्टार लेबल उपकरणांची व उत्पादकांची नावे, क्षमता, त्यांस दिलेले स्टार मानांकन इ. परिपूर्ण माहिती उपलब्ध आहे. त्याचा उपयोग करावा.

४. सर्व शासकीय/ निमशासकीय/ महामंडळे/ स्थानिक स्वराज्य संस्था/ महामंडळे/शासन अंगीकृत उपक्रम/शासन अनुदानित संस्था/ निमशासकीय उद्योग यांनी त्यांच्या भांडार खरेदी पध्दतीमध्ये या सूचनांच्या अनुषंगाने योग्य ते बदल करावेत.

५. सार्वजनिक बांधकाम विभागाने त्यांची भांडार खरेदी या शासन परिपत्रकानुसार केली जाईल असे पाहावे. सदर शासन परिपत्रकातील तरतुदी बी.ओ.टी./पी.पी.पी. (पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप) वा अन्य पध्दतीने राबविण्यात येणाऱ्या वरील प्रकल्पांना देखील लागू राहतील.

६. सदर सर्व संस्थांनी त्यांचे दरसूचीत आवश्यक ते बदल करावेत. सार्वजनिक बांधकाम विभाग (विद्युत) यांनी देखील दरसूचीत त्वरीत बदल करावेत.

७. सदर परिपत्रकातील सूचनांची सर्व प्रशासकीय विभागांनी काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याची दक्षता घ्यावी. त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये/ संस्था/ महामंडळ/ अन्य घटक यांच्याकडून अंमलबजावणी करून घ्यावी. अंमलबजावणी केल्याबाबतचे प्रमाणपत्र सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालये/संस्था/महामंडळ/अन्य घटक यांच्याकडून प्राप्त करावे. प्रशासकीय विभागाने त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व घटकांकडून या सूचनांची अंमलबजावणी केल्याचे प्रमाणपत्र परिशिष्ट १ अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे प्राप्त करावे.

८. प्रशासकीय विभागाने त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व घटकांकडून या सूचनांची अंमलबजावणी केल्याचे प्रमाणित करून ऊर्जा (अपारंपरिक ऊर्जा) विभागास पाठवावे. सदर प्रमाणपत्र परिशिष्ट १ ब मध्ये नमूद केल्या प्रमाणे असावे.

९. सदर परिपत्रकाची अंमलबजावणी करण्यासाठी सहा महिन्याची मुदत देण्यात येत आहे. याबाबतचा प्रगती अहवाल दर दोन महिन्यांनी प्रशासकीय विभागाने ऊर्जा (अपारंपरिक ऊर्जा) विभागास या सोबतच्या परिशिष्ट २ मध्ये नमूद केलेल्या विवरणपत्रात सादर करावा. ऊर्जा विभागाने मुख्य सचिव कार्यालयास सहा महिन्यानंतर कार्यपूर्ती अहवाल सादर करावयाचा आहे.

१०. सदर परिपत्रक निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**मुख्य सचिव,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
४. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव.
५. मा. मंत्री (अपारंपरिक ऊर्जा) यांचे खाजगी सचिव.
६. सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
७. मुख्य सचिव यांचे कार्यालय.
८. अप्पर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, नियोजन, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, उद्योग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव, कृषि, मंत्रालय, मुंबई.
१३. प्रधान सचिव, नगर विकास, मंत्रालय, मुंबई.
१४. सचिव (ऊर्जा), मंत्रालय, मुंबई.
१५. सचिव ,पर्यावरण विभाग, मंत्रालय,मुंबई.
१६. सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
१८. सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. सर्व मंत्रालयीन विभागांचे सचिव.
२१. महासंचालक, महाराष्ट्र उर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे.
२२. सर्व परवानाधारक विद्युत कंपन्या.
२३. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने
२४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई ४००००१.
२५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
२६. अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य (अराप/रालेवि-१), मुंबई
२७. निवड नस्ती

**परिशिष्ट -१ अ**

**प्रमाणपत्र**

शासन परिपत्रक क्र. अपाऊ-२००९/प्र.क्र.१०/ऊर्जा-७, दिनांक २१.१.२०१० अन्वये मुद्दा क्र.१ ते ३ मधील सूचनांच्या अनुषंगाने भांडार खरेदी पध्दतीमध्ये/दरसूचीमध्ये आवश्यक ते बदल करण्यात आल्याबद्दल याद्वारे प्रमाणित करण्यात येत आहे.

कार्यालयप्रमुखाची सही व शिक्का

---

**परिशिष्ट -१ ब**

**प्रमाणपत्र**

शासन परिपत्रक क्र. अपाऊ-२००९/प्र.क्र.१०/ऊर्जा-७, दिनांक २१.१.२०१० अन्वये मुद्दा क्र.१ ते ३ मधील सूचनांच्या अनुषंगाने भांडार खरेदी पध्दतीमध्ये /दरसूचीमध्ये आवश्यक ते बदल या विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये/संस्था/महामंडळे/उपक्रम इ. यामध्ये करण्यात आल्याबद्दल याद्वारे प्रमाणित करण्यात येत आहे.

**प्रशासकीय विभाग**

## परिशिष्ट - २

### विवरणपत्र
### (फेब्रुवारी-एप्रिल- जून २०१० अखेर द्यावयाचे विवरणपत्र)

प्रशासकीय विभागाचे नाव :-

| अ.क्र. | प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखाली येणारी शासकीय कार्यालये, महामंडळे, निमशासकीय/स्थानिक स्वराज्य संस्था, अनुदानित संस्था, अन्य घटक यांची एकूण संख्या | शासन परिपत्रक क्र. अपाऊ-२००९/ प्र.क्र.१०/ऊर्जा-७, दिनांक २१.१.२०१० प्रमाणे अद्यापपर्यंत प्रमाणित करणाऱ्या कार्यालये, महामंडळे, निमशासकीय/स्थानिक स्वराज्य संस्था, शासकीय अनुदानित संस्था, अन्य घटक यांची एकूण संख्या | शेरा |
|---|---|---|---|
| | | | |

प्रशासकीय विभाग

-----